**नगर भूमापन अधिकारी, गोरेगांव अधिनस्त मौजे एरंगळ, ता. बोरीवली जि. मुंबई उपनगर तसेच उप अधिक्षक, भूमी अभिलेख, मुंबई उपनगर कार्यालयांतर्गत हद्द कायम मोजणीचे नकाशे बनावटरित्या तयार करून, भूमी अभिलेख विभागाच्या मुळ अभिलेखात छेडछाड करण्यात आलेल्या प्रकरणाची जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचे अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या समितीस मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लवेसू-२०२१/प्र.क्र.४६५/ल-१.**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२२.

**संदर्भ** :- १. शासन निर्णय क्र. लवेसू-२०२१/प्र.क्र.४६५/ल-१, दिनांक २४.१.२०२२.
२. क्र.न.भू. १ /अभिलेख छेडछाड/समिती गठित/चौकशी/२०२२, दि. २६.२.२०२२ चे पत्र.
३. क्र.न.भू. १ /अभिलेख छेडछाड/समिती गठित/चौकशी/२०२२, दि. ४.३.२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

नगर भूमापन अधिकारी, गोरेगांव अधिनस्त मौजे एरंगळ, ता. बोरीवली जि. मुंबई उपनगर तसेच उप अधिक्षक, भूमी अभिलेख, मुंबई उपनगर या कार्यालयांतर्गत हद्द कायम मोजणीचे नकाशे बनावटरित्या तयार करून, भूमी अभिलेख विभागाच्या मुळ अभिलेखात छेडछाड करण्यात आल्याबाबत भुमी अभिलेख विभागास तक्रारी प्राप्त झाल्या असून याबाबत मा. विरोधीपक्ष नेते, महाराष्ट्र विधानपरिषद व इतर सदस्य यांनी महाराष्ट्र विधानपरिषद नियम १०१ अन्वये महाराष्ट्र विधानमंडळाच्या (हिवाळी) अधिवेशन २०२१ मध्ये लक्षवेधी सूचना क्र. ३४० उपस्थित केली होती. सदर लक्षवेधी सुचनेवरील चर्चेवेळी मा.मंत्री (महसूल) यांनी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचेमार्फत संपूर्ण प्रकरणाची चौकशी करण्याची घोषणा केली होती. त्यास अनुसरून सदर संपूर्ण प्रकरणाची चौकशी करण्याकरीता जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचे अध्यक्षतेखाली संदर्भाधिन शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आली आहे. सदर प्रकरणाचे चौकशीसाठी सदर समितीचे सदस्य सचिव तथा उप संचालक, भूमी अभिलेख, कोकण प्रदेश, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये सदर समितीस २ महिने मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

नगर भूमापन अधिकारी, गोरेगांव अधिनस्त मौजे एरंगळ, ता. बोरीवली जि. मुंबई उपनगर तसेच उप अधिक्षक, भूमी अभिलेख, मुंबई उपनगर या कार्यालयांतर्गत हद्द कायम मोजणीचे नकाशे बनावटरित्या तयार करून, भूमी अभिलेख विभागाच्या मुळ अभिलेखात छेडछाड करण्यात आलेल्या संपूर्ण प्रकरणाची चौकशी करण्याकरीता संदर्भाधिन शासन निर्णयान्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांचे अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या चौकशी समितीस २ महिने मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. सदर समितीने उक्त प्रकरणाची सखोल चौकशी करून स्वयंस्पष्ट अहवाल २ महिन्यात शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१७२५१६१७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, pseudonym=6A69B309A6281D99F5A420A268723ECE6A8B4A60, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2022.03.07 18:57:39 +05'30'

**( भगवान सावंत )**

अवर सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव.
४. मा.मंत्री (महसूल)/मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
५. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
६. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७. मा.विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा/महाराष्ट्र विधानपरिषद.
८. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव.
९. आयुक्त, मुंबई महानगरपालिका.
१०. जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे.
११. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर.
१२. अतिरिक्त आयुक्त (पश्चिम उपनगरे), मुंबई महानगरपालिका.
१३. उप संचालक, भूमी अभिलेख, कोकण प्रदेश, मुंबई .
१४. सह जिल्हा निबंधक, मुंबई उपनगर.
१५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक.
१६. निवड नस्ती (ल-१).